**“पुस्तकांचे गाव” विस्तार योजनेअंतर्गत नाशिक महसूली विभागातील अमळनेर, जि. जळगाव येथील पुस्तकांच्या गावांना मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुगाव-२०२४/प्र.क्र.६६/भाषा-३**
नवीन प्रशासकीय भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक: २०/०८/२०२४

**वाचा : १)** शासन निर्णय, क्र. पुगाव-२०२०/ प्र.क्र.४८/२०२०/भाषा-३, दि.०४.०१.२०२२
२) शासन निर्णय, क्र. पुगाव-२०२२/ प्र.क्र.२३/भाषा-३, दि.२५.०३.२०२२
३) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांचा क्र.रामविस/पुगाव/प्र.५-अ/ प्र.क्र.६०/४८४/२०२४, दि. १५.०५.२०२४

**पार्श्वभूमी :**

“पुस्तकांचे गाव” योजनेची व्यापकता वाढविण्याच्या दृष्टीने तसेच मा. मुख्यमंत्री महोदयांनी केलेल्या घोषणेच्या अनुषंगाने प्रत्येक जिल्ह्यात एक “पुस्तकांचे गाव” सुरु करुन योजनेचा विस्तार करणेबाबतचा निर्णय संदर्भाधीन क्र.१ येथील दि. ०४.०१.२०२२ च्या शासन निर्णयानुसार घेण्यात आला. सदर शासन निर्णयानुसार “पुस्तकांचे गाव” ही योजना विस्तारीत स्वरुपात सुरु करताना पहिल्या टप्प्यात ६ महसूली विभागात सुरु करण्यात येणार आहे. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र.२, येथील दि.२५.०३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये औरंगाबाद, नागपूर, कोकण व पुणे या ४ महसुली विभागात “पुस्तकाचे गाव” सुरु करण्यासाठी मान्यता देण्यात आलेली आहे.

तसेच नाशिक महसूली विभागातील अमळनेर, जि.जळगांव येथे “पुस्तकांचे गाव” सुरु करणेबाबत संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन क्र.३ येथील पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव मा.मंत्री (मराठी भाषा) यांच्या अध्यक्षतेखालील निवड समितीसमोर ठेवण्यात आला होता. सदर समितीच्या निर्णयानुसार प्रस्तुत प्रस्तावास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

समितीने घेतलेल्या निर्णयानुसार, नाशिक महसूली विभागातील खानदेश शिक्षण मंडळ, अमळनेर, जि.जळगांव येथे “पुस्तकांचे गाव” सुरु करणेबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. मराठी भाषा विभाग शासन निर्णय क्र. पुगाव-२०२०/प्र.क्र.४८/भाषा-३, दि.०४.०१.२०२२ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार तपासणी करण्याची तसेच संबंधित संस्था अटींची पूर्तता करतील याबाबतची जबाबदारी संचालक, राज्य मराठी विकास संस्था यांची राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२०१२३४५५४८३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AISHVARYA
NITIN GOVEKAR

Digitally signed by AISHVARYA NITIN GOVEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT,
2.5.4.20=1bc2889d0526cabd7a61ac7caff2c6c8138e2072666f41c1766386c6f759ac20, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=EFE268FD47B3926C2BD993E696EBAFD8D4A9743A3C2180A0E956A47899EC5548, cn=AISHVARYA NITIN GOVEKAR
Date: 2024.08.20 12:51:14 +05'30'

**( ऐश्वर्या गोवेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४. मा.सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१३. सर्व मंत्रालयीन विभाग,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. भाषा संचालक, भाषा संचालनालय, बांद्रा, मुंबई,
१८. अध्यक्ष / सचिव महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
१९. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२०. संचालक / प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
२१. मराठी भाषा विभाग / सर्व कार्यासने,
२२. निवड नस्ती (भाषा-३).